**सिंचनव्यवस्थापनेच्या कामासाठी उपविभागीय**
**कार्यालये स्थालांतरणाने उपलब्ध करुन**
**देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक-सीओई-२००८/१३९३/(४६०/२००८) मोप्र-(२),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक - १५ मार्च, २०१०.

पहावे- १) शासन निर्णय क्र.सीओई-२००६/२९/(२४३/२००६)/मोप्र-(२),दिनांक २०.१२.०६
२) का.स.गो.म.पा.वि.म., औरंगाबाद यांचे पत्र क्र गोमपाविम/आढावा/(४१/२००६) आ-२/३६४१, दि. १२/५/०९ व पत्र क्र. ४१८८, दि. १/६/२००९

**प्रस्तावनाः-**

संदर्भ क्र १ च्या शासन निर्णयान्वये उस्मानाबाद आणि लातूर जिल्हयात मोठया प्रमाणात साठवण तलाव पूर्ण झाल्यामुळे सदरील जिल्हयाच्या विकास कामासाठी घेतलेल्या आढावा बैठकीमध्ये झालेल्या चर्चेनुसार गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळातील अधीक्षक अभियंता, जायकवाडी प्रकल्प मंडळ अंतर्गत कार्यान्वीत माजलगांव कालवा उपविभाग क्र. ४८ पडेगांव व माजलगांव कालवा उपविभाग क्र. ४१, सोनपेठ ही दोन उपविभागीय कार्यालये सिंचन व्यवस्थापनेच्या कामासाठी फिरवा फिरवीने अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, बीड यांना उपलब्ध करुन दिली. दोन्ही उपविभागीय कार्यालयाकडे सिंचन व्यवस्थापनेची कामे सोपविली असली तरी बांधकाम प्रणालीतील कामे ही सदर उपविभागीय कार्यालयाकडे असल्यामुळे या कार्यालयाचा वेतन व भत्यावरील खर्च शासनामार्फत महामंडळाकडील दिल्या जाणा-या निधीतूनच भागविण्यासाठी उपरोक्त कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्यावरील खर्च आणि प्रशासकीय निर्णयासाठी गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत असलेल्या अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, परळी वैजनाथ (ल.पा.वि., लातूर) संलग्न करुन व अधीक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे प्रकल्प मंडळ, उस्मानाबाद (लपावि., उस्मानाबाद ) या मंडळ कार्यालयास संलग्न करुन दोन्ही विभागाचा खर्च मागणी क्र. (आय-३) ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (८०) सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (बी) (योजनांतर्गत) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (संगणक संकेतांक ४७०१ एच (८९९) (बी) योजनांतर्गत या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्याचे आदेश होते.

उपरोक्त दोन्ही कार्यालये सिंचन व व्यवस्थापनेच्या कामासाठी कायमस्वरुपी वर्ग झाल्याने वर नमूद कार्यालयास संलग्न केलेली तात्पुरती योजना संपुष्टात आणून वेतन व भत्ते यावरील खर्च सिंचन व व्यवस्थापन प्राधिकरण खर्चातून करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

सिंचन व व्यवस्थापनेची कामे दि. १/१/२००५ पासून शासनाच्या नियंत्रणाखाली वर्ग झाल्यामुळे, तसेच माजलगांव कालवा उपविभाग क्र. ४८ पडेगांव व माजलगांव कालवा उपविभाग क्र. ४१ सोनपेठ हे वर्ग झालेली दोन्ही कार्यालये सिंचन व्यवस्थापन कामासाठी कायमस्वरुपी अधिक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, बीड कार्यालयाकडे वर्ग झाली असल्यामुळे संदर्भ क्र १ च्या शासन निर्णयाचे या दोन्ही उपविभागीय कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्यावरील खर्च आणि प्रशासकीय नियंत्रणासाठी गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत मंडळ कार्यालयास संलग्न केलेली व्यवस्था या शासन निर्णयान्वये संपुष्टात आणण्यात येत असून, सदरची दोन्ही उपविभागीय कार्यालये सोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या पदांसह मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत अधिक्षक अभियंता व प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, बीड यांचेकडे वर्ग करण्यात येत असून, उपविभागातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष २७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे (योजनेतर) मागणी क्र. आय-३ उपशिर्ष व्यवस्थापन आस्थापना (संगणक संकेतांक २७०१-९९७८) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

वित्त विभागाच्या दि. १५.१०.१९९२ च्या शासन निर्णयानुसार कार्यप्रकारातील बदलांमुळे जो हेतू बदल झाल्यावर शासनावर कोणताही आर्थिक बोजा पडणार नाही ही बाब लाक्षणिक पूरक मागणीद्वारे त्यानंतरच्या नजिकच्या अधिवेशनात विधानमंडळाच्या नजरेत आणण्यासाठी पूरक मागणीचा प्रस्ताव वित्त विभागाकडे सादर करण्यात येईल. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र. १०९२/सीआर ८०६/व्यय ६, दि. १५/१०/९२ अन्वये प्रशासनिक विभागास प्राप्त झालेल्या प्राधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा आनौपचारीक संदर्भ क्र. ५०/व्यय-१२, दि. १५.०२.२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आलेले असून, त्याचा संगणक संकेतांक २०१००३१५१४१४२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

सहपत्र- विवरणपत्र

(मु. कि. वैरागडे)
शासनाचे उपसचिव

प्रतः-

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (म.कृ.खो.वि.म. वगळून) व लाक्षेवि, मंत्रालय, मुंबई-३२
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (म.कृ.खो.वि.म.), मंत्रालय, मुंबई-३२
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई-३२
मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व महामंडळ (५), जलसंपदा विभाग
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता (क्षेत्रिय स्तर), जलसंपदा विभाग
मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
उप सचिव (सिं.व्य.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता , जायकवाडी प्रकल्प मंडळ, औरंगाबाद
अधीक्षक अभियता , बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, परळी वैजनाथ
अधीक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ, उस्मानाबाद
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, विधानभवन, मुंबई (दोन प्रती)
सर्व अधिकारी व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन मोप्र-२ (संग्रहार्थ)

**शासन निर्णय क्र. सीओई-२००८/१३९३/(४६०/२००८)/मोप्र-२, दि. १५.०३.२०१० सोबतचे सहपत्र.**

**विवरणपत्र.**

**माजलगांव कालवा उपविभाग क्र. ४१ सोनपेठ मुख्यालय उमरगा या कार्यालयातील पदे व त्यांचे वेतन भत्त्यावर होणारा वार्षिक खर्च.**

| अ.क्र. | कार्यरत पदे | मंजूर | वार्षिक खर्च (रु. लक्ष) |
|---|---|---|---|
| १. | उपविभागीय अभियंता | १ | ४.९२ |
| २. | कनिष्ठ अभियंता | ४ | १९.२० |
| ३. | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ४ | १२.० |
| ४. | वरिष्ठ लिपिक | १ | ३.०० |
| ५. | कनिष्ठ लिपिक | २ | ४.३२ |
| ६. | टंकलेखक | १ | २.४० |
| ७. | अनुरेखक | १ | २.७६ |
| ८. | शिपाई | २ | २.६४ |
| ९. | वाहनचालक | १ | २.०४ |
| १०. | चौकीदार | १ | १.३२ |
| | **एकूण** | **१८ मंजूर पदे** | **५४.६००** |

**माजलगांव कालवा उपविभाग क्र. ४८ पडेगांव मुख्यालय अहमदपूर या कार्यालयातील पदे व त्यांचे वेतन भत्त्यावर होणारा वार्षिक खर्च.**

| अ.क्र. | कार्यरत पदे | मंजूर | वार्षिक खर्च (रु. लक्ष) |
|---|---|---|---|
| १. | उपविभागीय अभियंता | १ | ४.९२ |
| २. | कनिष्ठ अभियंता | ६ | २८.८० |
| ३. | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ४ | १२.०० |
| ४. | वरिष्ठ लिपिक | १ | ३.०० |
| ५. | कनिष्ठ लिपिक | ३ | ६.४८ |
| ६. | टंकलेखक | १ | २.४० |
| ७. | अनुरेखक | १ | २.७६ |
| ८. | शिपाई | २ | २.६४ |
| ९. | वाहनचालक | १ | २.०४ |
| १०. | चौकीदार | १ | १.३२ |
| | **एकूण** | **२१ मंजूर पदे** | **६६.३६०** |

**टिप :-** यापूर्वी उपरोक्त नमूद पदांचे वेतन व भत्त्यावरील खर्च महामंडळ मुख्य कार्यालयाच्या खर्चातून होत होता.